**मंत्रालयीन विभागातील लिपिक/लिपिक-टंकलेखकाचे सेवाप्रवेशोत्तर प्रशिक्षण व परीक्षा सन २०१८-१९ साठी अर्ज मागविण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन परिपत्रक क्रमांकः सेप्रप१९१८/प्र.क्र.२२/का.१७**

हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
तारीख: १८ ऑगस्ट, २०१८.

**शासन परिपत्रक-**

महाराष्ट्र शासन दुय्यम मंत्रालय सेवा ( निम्नस्तर लिपिक ) सेवाप्रवेशोत्तर प्रशिक्षण परीक्षा नियम, दिनांक ६ जून, १९७७ मधील तरतुदीनुसार मंत्रालयीन विभागातील लिपिक व लिपिक-टंकलेखकांसाठी सन २०१८-१९ मध्ये आयोजित करावयाच्या सेवाप्रवेशोत्तर प्रशिक्षण आणि परीक्षेसाठी प्रथमच बसण्यास पात्र असलेल्या उमेदवारांचे विहित नमुन्यातील अर्ज या परिपत्रकान्वये मागविण्यात येत आहेत.

२. सदरहू परीक्षा नियमातील तरतुदीनुसार पात्र लिपिक/ लिपिक-टंकलेखक यांना प्रशिक्षण वर्गाचा लाभ फक्त एकदाच घेता येतो. त्यामुळे ज्या लिपिक/ लिपिक-टंकलेखक यांनी यापूर्वी प्रशिक्षणाचा लाभ घेतला आहे त्यांना पुन्हा प्रशिक्षणाचा लाभ घेता येणार नाही. जे लिपिक/ लिपिक-टंकलेखक यापूर्वी झालेल्या लिपिक/ लिपिक-टंकलेखक सेवा प्रवेशोत्तर प्रशिक्षण परीक्षेत अनुत्तीर्ण झाले आहेत किंवा सदर परीक्षेला अनुपस्थित राहिले आहेत त्यांचे सन २०१८-१९ मधील सेवाप्रवेशोत्तर प्रशिक्षण परीक्षेस बसण्यासाठीचे अर्ज, उपरोक्त नमूद प्रशिक्षण पूर्ण झाल्यानंतर स्वतंत्रपणे मागविण्यात येतील त्यावेळी ते पाठविण्यात यावेत.

३. सदर प्रशिक्षण आणि परीक्षेसाठी सादर करावयाचा विहित नमुन्यातील अर्ज मंत्रालयीन इंट्रानेटवरील "आवेदन पत्र" या शिर्षाखाली उपलब्ध आहे. तरी मंत्रालयीन विभागातील जे लिपिक/लिपिक-टंकलेखक सन २०१८-१९ च्या परीक्षेस पहिल्यांदाच बसण्यास पात्र आहेत आणि ज्यांचे सेवाप्रवेशोत्तर परीक्षेचे प्रशिक्षण अद्याप झालेले नाही अशा लिपिक/लिपिक-टंकलेखकांचे विहित नमुन्यातील अर्ज आस्थापना अधिकाऱ्यांनी प्रमाणित करुन, या विभागाकडे **दिनांक ७ सप्टेंबर, २०१८** पर्यंत पाठवावेत. **सदर अर्जामध्ये उमेदवाराचा नियुक्ती दिनांक, उमेदवाराने पायाभूत प्रशिक्षण पूर्ण केले आहे किंवा कसे तसेच त्याच्या नियुक्तीचा प्रकार (सरळसेवा/पदोन्नती/अनुकंपा) इत्यादी माहिती बरोबर असल्याची आस्थापना अधिकाऱ्यांनी खात्री करावी.** विहित नमुन्यातील अर्जात उमेदवाराने आपले संपूर्ण नाव, नियुक्ती दिनांक, विभागाचे नाव इत्यादी तपशील अचूक नमूद करावा.

४. सदर परिपत्रक सर्व संबंधित लिपिक/लिपिक-टंकलेखकांच्या (प्रतिनियुक्तीवर/रजेवर असलेल्या लिपिक/लिपिक-टंकलेखकांसह) कृपया त्वरीत लेखी स्वरुपात निदर्शनास आणावे व

त्यांची स्वाक्षरी घेऊन आपल्या अभिलेखात जतन करुन ठेवावे. त्याबाबतची संपूर्ण जबाबदारी संबंधित विभागाच्या आस्थापना शाखेची राहील, याची कृपया नोंद घेण्यात यावी.

५. यावर्षी लिपिक-टंकलेखक सेवाप्रवेशोत्तर प्रशिक्षण परीक्षेचा अभ्यासक्रम हा लिपिक-टंकलेखक यांचेसाठी राज्य प्रशिक्षण धोरणांतर्गत आयोजित करण्यात येणाऱ्या पायाभूत प्रशिक्षणादरम्यान आयोजित करण्याचे प्रस्तावित असून अंदाजे ऑक्टोबर-डिसेंबर, २०१८ मध्ये हे प्रशिक्षण वर्ग यशदाच्या अधिनस्त विभागीय प्रशिक्षण संस्थेमध्ये आयोजित करण्यात येणार आहेत. त्यामुळे एकूण किती उमेदवार प्रशिक्षणासाठी पाठवावयाचे आहेत याची निश्चित संख्या व नावे यशदा या संस्थेस पाठवावयाची आहेत. तरी सर्व विभागांच्या आस्थापना शाखांना विनंती करण्यात येते की, त्यांनी त्यांच्या विभागातील उमेदवारांचे अर्ज या कार्यासनास विहीत कालमर्यादेत पाठविण्याची दक्षता घ्यावी. **विहीत कालमर्यादेनंतर प्राप्त होणारे अर्ज स्विकृत केले जाणार नाहीत याची कृपया नोंद घ्यावी.**

६. सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेताक २०१८०८१८१२४१०२२४०७ असा आहे. हे परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Arati Shankar Desai

Digitally signed by Arati Shankar Desai
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=General Administration Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=ef2d654ac80fbb94f45fef635ddbb5b5e9301a3a70a4f4298a52a5fd8bef5f42, serialNumber=49bc5a99b724c2018fcd117798aebf1146777ecb321b7b45309e97b033f098b8, cn=Arati Shankar Desai
Date: 2018.08.18 12:42:45 +05'30'

**(आरती देसाई)**
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. सर्व मंत्रालयीन विभाग (आस्थापना)
२. सामान्य प्रशासन विभाग/कार्यासन १४-अ
३. निवडनस्ती